**महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल लिहिणे व जतन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग,**
**शासन परिपत्रक क्र.मबाआ-२०२४/प्र.क्र.५७/का-७**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २७ मे,२०२४

**संदर्भ**:- १. सामान्य प्रशासन विभाग,शा.नि.क्र.सीएफआर १२१०/प्र.क्र.४७/२०१०/तेरा,दि.१.११.२०११
२. सामान्य प्रशासन विभाग,शा.नि.क्र.सीएफआर १२११/प्र.क्र.२५७/तेरा,दि.२.२.२०१७
३. महिला व बाल विकास विभाग,शा.नि.क्र.मबाआ-२०१५/प्र.क्र.६/का-७,दि.३०.६.२०१८

**प्रस्तावना**:-

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१.११.२०११ च्या शासन निर्णयान्वये शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल लिहिणे व जतन करणे याबाबत एकत्रित सूचना निर्गमित करण्यात आले आहेत. तथापि, त्यानंतरही महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल प्रतिवेदन अधिकारी व पुनर्विलोकन अधिकारी यांच्याकडून विहित वेळेत लिहिण्यात येत नसल्यामुळे या विभागातंर्गत पदोन्नती देताना, वयाच्या ५०/५५ वर्षानंतर सेवेत ठेवण्याबाबतचे पुनर्विलोकन, आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देताना अडचणी येत आहेत.त्यामुळे महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल लिहिणे व जतन करण्यासंदर्भात सुधारीत मार्गदर्शक सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक**:-

आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे व आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविलेल्या प्रमाणे लिहिणे,प्रतिवेदन, पुनर्विलोकन, संस्करण व जतन करण्यासंदर्भात सन २०२३-२४ पासून कार्यवाही करण्यात यावी.

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०२.०२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयात विहित केलेल्या नमुन्यानुसार या विभागातंर्गतील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल लिहिण्यात यावेत.

गट-अ संवर्गातील सहआयुक्त व उपआयुक्त या संवर्गातील अधिकाऱ्यांचे कार्यमुल्यमापन अहवाल पुनर्विलोकन करण्याकरीता दिनांक ३० एप्रिल पर्यत शासनास सादर करण्यात यावेत.

जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना),सहायक आयुक्त,परिविक्षा अधिक्षक या पदावर कार्यरत अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल दरवर्षी दिनांक. १५ मे पर्यत शासनास जतन करण्यासाठी दोन्ही आयुक्तालयाने पाठविण्याची दक्षता घ्यावी.

तसेच गट-ब संवर्गातील अधिक्षक, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा),जिल्हा महिला  बाल विकास अधिकारी, निरीक्षक प्रमाणित शाळा व संस्था, रचना व कार्यपध्दती अधिकारी,अधिव्याख्याता,निरीक्षक या पदावर कार्यरत अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन अहवालाचे जतन महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांच्याकडे राहील.

त्यानुसार महिला व बाल विकास विभागाच्या अधिपत्याखालील गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल/कार्यमूल्यमापन अहवाल प्रतिवेदन/पुनर्विलोकन करण्याबाबतच्या सूचना वर नमूद दि.३०.६.२०१८ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आल्या आहेत.

तसेच दरवर्षी एप्रिल महिन्याच्या शेवटच्या आठवडयात दोन्ही आयुक्तालयाच्या स्तरावर कार्यमूल्यमापन अहवाल संदर्भात कॅम्प आयोजित करण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०२४०५२७१७५४१४३८३० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2024.05.29 18:16:02 +05'30'

( वि.रा.ठाकूर )
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (आयुक्तालय, पुणे मार्फत)
४. सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक
५. सर्व विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास विभाग (आयुक्तालय, पुणे मार्फत)
६. सर्व जिल्हा महिला व बालविकास अधिकारी (आयुक्तालय, पुणे मार्फत)
७. सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (मवबावि),जिल्हा परिषद (आयुक्तालय, पुणे मार्फत)
८. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी)/(ग्रामीण) (आयुक्तालय, पुणे मार्फत)
९. निवड नस्ती (कार्यासन-७)

# विवरणपत्र

| अ.क्र. | गट-अ संवर्गातील पदे | प्रतिवेदन अधिकारी | पुनर्विलोकन अधिकारी | संस्करण | जतन |
|---|---|---|---|---|---|
| १ | सहआयुक्त | संबंधित आयुक्त | सचिव | शासन | शासन |
| २ | उपआयुक्त/विभागीय उपआयुक्त | संबंधित आयुक्त | सचिव | शासन | शासन |
| ३ | सहायक आयुक्त (दोन्ही आयुक्तालय) | संबंधित उपआयुक्त | संबंधित आयुक्त | संबंधित आयुक्त | शासन |
| ४ | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | संबंधित विभागीय उपआयुक्त | संबंधित आयुक्त | संबंधित आयुक्त | शासन |
| ५ | जिल्हा कार्यक्रम अधिकारी (मवबावि) जि.प. | संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प. | संबंधित आयुक्त | संबंधित आयुक्त | शासन |
| ६ | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना) | संबंधित विभागीय उपआयुक्त | संबंधित आयुक्त | संबंधित आयुक्त | शासन |
| ७ | परिविक्षा अधिक्षक | संबंधित सहआयुक्त | संबंधित आयुक्त | संबंधित आयुक्त | शासन |

| अ.क्र. | गट-ब संवर्गातील पदे | प्रतिवेदन अधिकारी | पुनर्विलोकन अधिकारी | संस्करण | जतन |
|---|---|---|---|---|---|
| १ | अधिक्षक/अधिक्षिका (सर्व शासकीय संस्था) | संबंधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | संबंधित विभागीय उपआयुक्त | संबंधित आयुक्त | आयुक्तालय, पुणे |
| २ | निरीक्षक (प्रमाणित शाळा व संस्था) | संबंधित उपआयुक्त | संबंधित सहआयुक्त | संबंधित आयुक्त | आयुक्तालय, पुणे |
| ३ | रचना व कार्यपध्दती अधिकारी | संबंधित उपआयुक्त | संबंधित सहआयुक्त | संबंधित आयुक्त | आयुक्तालय, पुणे |
| ४ | अधिव्याख्याता | संबंधित उपआयुक्त | संबंधित सहआयुक्त | संबंधित आयुक्त | आयुक्तालय, पुणे |
| ५ | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (गट-ब) | संबंधित विभागीय उपआयुक्त | संबंधित सहआयुक्त | संबंधित आयुक्त | आयुक्तालय, पुणे |
| ६ | सांख्यिकी अधिकारी | संबंधित उपआयुक्त | संबंधित सहआयुक्त | संबंधित आयुक्त | आयुक्तालय, पुणे |
| ७ | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा) | संबंधित जिल्हा कार्यक्रम अधिकारी (मवबावि) जि.प. | संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प. | संबंधित आयुक्त | आयुक्तालय, पुणे |